**समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षामधे जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांमधील कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: डायट-२०२०/प्र.क्र.५३ /प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ सप्टेंबर, २०२०

**वाचाः**-१) मानव संसाधन विकास मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र.७-२/२०२०-IS.१२(GEN), दि.२७ एप्रिल,२०२०.
२) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६/०४/२०२०
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३,दि.०४/०५/२०२०
४) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय,दि.१८/०५/२०२०
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. निधिवि-२०२०/प्र.क्र.४५/प्रशिक्षण, दि. ०९/०६/२०२० व दि.१४/०९/२०२०
६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. निधिवि-२०२०/प्र.क्र.५०/प्रशिक्षण, दि.२१/०७/२०२०

**प्रस्तावनाः-**

समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) ही योजना केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेसाठी केंद्र शासन ६०% व राज्य शासन ४०% निधी उपलब्ध करून देते. या योजनेखाली ३२२ शिक्षक व १२६ शिक्षकेतर पदावरील खर्चासाठी केंद्र शासनाने अनुदान उपलब्ध करुन देण्याचे मान्य केले आहे. त्यानुसार या योजनेसाठी सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. २७ एप्रिल, २०२० रोजीच्या पत्रान्वये ( General Head ) सर्वसाधारण लेखाशीर्षाखाली केंद्र शासन हिस्सा (६० टक्के) रू.५,५१,१४,०००/- इतके तदर्थ अनुदान वितरीत केले आहे. तसेच अनुसुचित जाती उपयोजना ( SCSP ) या लेखाशीर्षाखाली रु. १,०८,१७,०००/- इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे. त्यानुसार ४०% राज्य शासनाच्या हिस्सापोटी सर्वसाधारण या लेखाशीर्षाखाली रु. ९,१८,५७,०००/- इतके अनुदान तर अनुसुचित जाती उपयोजनेखालील वेतन या उद्दिष्टाखाली रु. १,६७,३४,०००/- (रु. एक कोटी सदुसष्ट लाख चौत्तीस हजार फक्त ) अनुदान वितरीत करण्यात आले आहे. अशाप्रकारे वेतनासाठी आतापर्यंत रु. १०,८५,९१,०००/- इतकी तरतुद वितरीत करण्यात आली आहे. राज्यातील जिल्हा शिक्षण व

प्रशिक्षण संस्थांमधील १५३ शिक्षकेतर पदांचे वेतन केंद्र शासनाने समग्र शिक्षा कार्यक्रमाखाली अमान्य केले आहे. तसेच ज्या ४४८ (३२२ शिक्षक व १२६ शिक्षकेतर ) पदांचे वेतन मान्य केले आहे त्यापदावरील खर्च भागविण्यासाठी अपेक्षित खर्च रु. ४०.३६ कोटी इतका आहे. त्यासाठी प्रत्यक्षात केंद्र शासनाने AWP&B मध्ये यासाठी रु. २५.३४ कोटी इतकी तरतुद मंजूर केली आहे. म्हणजेच आवश्यक तरतुदीपेक्षा रु. १५.०२ कोटी इतकी कमी तरतुद मंजुर करण्यात आली आहे. सदर पदांच्या अतिरिक्त वेतनाचा भार सुध्दा राज्य शासनावर येणार आहे. त्यामुळे, या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी राज्य हिस्स्यातुन आवश्यक तरतुद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांमधील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्यासाठी या शासन निर्णयान्वये राज्य शासनाच्या हिस्स्यापोटी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून रु. १२,८३,०७,०००/- (रु. बारा कोटी त्र्याऐंशी लाख सात हजार फक्त ) इतकी तरतूद वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च मागणी क्र. ई-२, मुख्य लेखाशीर्ष २२०२- सर्वसाधारण शिक्षण, १०६, शिक्षक आणि इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (२२०२ । ६१२ ) सर्वसाधारण, (राज्य हिस्सा ४०% ) कार्यक्रम, ०१ वेतन या उद्दिष्टाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर तरतुद नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, शिक्षण यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. सदर खर्च वित्त विभागाच्या १६ एप्रिल २०२०, ४ मे २०२० व १८ मे, २०२० च्या शासन निर्णय / परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर खर्चाचा अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र इत्यादींची माहिती प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत राज्य प्रकल्प संचालक , समग्र शिक्षा व शालेय शिक्षण व क्रीडा विभागास आयुक्त, शिक्षण व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, यानी पाठवावी. सदर खर्च समग्र शिक्षा अभियान कार्यालयाच्या लेख्यांमध्ये प्रतिबिंबित होणे आवश्यक असल्याने या लेखाशीर्षाखालील जमा व खर्च याची माहिती समग्र शिक्षा अभियान कार्यालयाने Project Management System (PMS/PRABHANDH ) या प्रणालीवर नोंदवावी.

५. राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांनी शिक्षक शिक्षण या योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचा सर्वसाधारण, अनुसुचित जाती व अनुसुचित जमाती उपयोजनांसाठी प्राप्त होणारा निधी वितरीत व खर्च करण्यासाठी नियमानुसार धोरण ठरविणे

आवश्यक आहे. त्यामुळे सोबतच्या **विवरणपत्र- अ** मधील कर्मचाऱ्यांचे वेतन राज्य शासनाने यासाठी केलेल्या तरतुदीतून करावे लागेल, त्या प्रमाणे नियोजन करावे. यापुढील खर्चासाठी तशी स्वतंत्र निधीची मागणी करावी, जेणेकरुन कर्मचाऱ्यांचे वेतन प्रलंबित राहणार नाही.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ४१६/२०२०/व्यय-५ दि. २१/९/२०२० यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९२९१५४६१९५१२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.09.29 15:48:47 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

<u>**प्रत-**</u>

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे.
८. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
९. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
११. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती (प्रशिक्षण).

विवरणपत्र- अ

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. डायट-२०२०/प्र.क्र.५३/प्रशिक्षण, दि. २९/९/२०२० च्या सोबतचे जोडपत्र:-

| अ.क्र. | पदनाम | कार्यरत पदसंख्या |
|---|---|---|
| १) | सांख्यिकी सहायक | २१ |
| २) | ग्रंथपाल | २३ |
| ३) | लघुलेखक | ३२ |
| ४) | कनिष्ठ लिपिक | ६४ |
| ५) | शिपाई | ५७ |
| | एकूण | १९७ |